**सहकारी उपसा जलसिंचन योजनांना द्यावयाचे अर्थसहाय्य.**

**महाराष्ट्र शासन,**

सहकार व वस्त्रोद्योग विभाग,

शासन निर्णय क्रमांक सीएसएल-१४९४/२८२२/प्र.क्र.१३३/७-स,

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२. दिनांक - १९ नोव्हेंबर, १९९४.

**प्रस्तावना :-** राज्यातील सहकारी उपसा जलसिंचन योजनांच्या प्रकल्प खर्चामध्ये गेल्या काही वर्षात सातत्याने वाढ होत असून त्यामुळे अल्प व सिमांत लाभार्थी शेतकरी सभासदच नव्हेत तर मध्यम व मोठ्या शेतक-यांना सुध्दा वाढता प्रकल्प खर्च करणे आर्थिकदृष्ट्या अडचणीचे झाले आहे. शासनाच्या खर्चाने ज्या लहान मोठ्या पाटबंधारे योजना घेण्यात येतात त्या योजनांच्या लाभ क्षेत्रातील शेतक-यांना कोणत्याही खर्चाविना पाण्याची सोय उपलब्ध होते. या उलट इतर भागातील शेतक-यांनी स्वतःच उपसा जलसिंचनाची व्यवस्था करण्याचे ठरविल्यास त्यांना योजनांचा संपूर्ण खर्च स्वतःच करावा लागतो. त्यामुळे सहकारी उपसा जलसिंचन योजनांच्या लाभधारक सभासदांवरील खर्चाचा बोजा कमी करुन तो काही प्रमाणात शासनाने उचलण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** राज्यातील सहकारी उपसा जलसिंचन योजनांच्या लाभधारक शेतकरी सभासदांवरील योजनांवर होणा-या खर्चाचा बोजा कमी करुन तो काही प्रमाणात उचलण्याची योजना राबविण्यास शासन मंजूरी देत आहे.

१. सदर योजनेचे स्वरुप व व्याप्ती सोबतच परिशिष्ट "अ" प्रमाणे राहील.

२. ही योजना राज्यस्तरीय योजना म्हणून राबविण्यात येईल.

४. उपसा जलसिंचन सहकारी संस्थांना द्यावयाच्या आर्थिक सहाय्याचे प्रस्ताव संबंधित जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यांनी छाननी करुन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था यांचेकडे पाठवावेत. सहकार आयुक्तांनी त्यांचे पातळीवर सदर प्रस्तावाची फेरछाननी करुन ते त्यांच्या अभिप्रायासह शासनाच्या मंजूरीसाठी सादर करावेत.

५. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ११४५/९४/व्यय-२, दिनांक १७ नोव्हेंबर, १९९४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

सही/-

( दि. मा. दहात )

उप सचिव, महाराष्ट्र शासन,

सहकार व वस्त्रोद्योग विभाग.

सहपत्र : परिशिष्ट "अ"

प्रत :
१) सर्व विभागीय आयुक्त,
२) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) सर्व जिल्हाधिकारी,
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व),
५) सरव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, मुंबई.
६) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., मुंबई.
७) सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., मुंबई.
८) अध्यक्ष / व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी कृषि व ग्रामीण विकास बँक, मुंबई.
९) व्यवस्थापक, सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका,
१०) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
११) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
१२) सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था, (सर्व)
१३) मुख्य संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.
१४) वित्त विभाग/नियोजन विभाग/ग्राम विकास व जलसंधारण विभाग/पाटबंधारे विभाग / मंत्रालयातील इतर सर्व विभाग
१५) मा.मुख्यमंत्री / मा.मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव (सर्व)
१६) मा.मुख्य सचिव यांचे खाजगी सचिव, १७) सहकार व वस्त्रोद्योग विभागातील सर्व कार्यासने, १८) निवडनस्ती.

(कृ.मा.प.

## परिशिष्ट "अ"

### उपसा जलसिंचन सहकारी संस्थांना द्यावयाचे अर्थसहाय्य

१) उपसा जलसिंचन सहकारी संस्थांना द्यावयाच्या शासकीय अर्थसहाय्याची योजना दिनांक १ एप्रिल १९९४ पासून अमंलात येईल.

२) दिनांक १ एप्रिल १९९४ रोजी ज्यांची कर्ज मागणी प्रकरणे वित्तीय संस्थांकडे प्रलंबित होती व ज्यांनी प्रकल्प उभारणीच्या कामास सुरुवात केली नव्हती अशा महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० च्या तरतुदीस अनुसरुन नोंदणी झालेल्या सहकारी संस्था सदर अर्थसहाय्य मिळण्यास पात्र राहतील.

३) उपसा जलसिंचन सहकारी संस्थेचा प्रकल्प राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँकेने मंजूर केलेला असावा.

४) उपसा जलसिंचन योजनेत समाविष्ट असलेल्या अल्प व अत्यल्प शेतकरी सभासदांनी ५ टक्के, मध्यम शेतकरी सभासदांनी १० टक्के व मोठया शेतकी सभासदांनी १५ टक्के स्वगुंतवणूक (डाऊन पेमेंट) केलेली असावी. अल्प व अत्यल्प, मध्यम तसेच मोठे शेतकरी राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँकेने (नाबार्डने) वेळोवेळी केलेल्या व्याख्येनुसार ठरविण्यात येतील.

५) उपसा जलसिंचन योजनेच्या प्रकल्प खर्चापैकी योजनेत समाविष्ट सभासदांनी केलेली स्वगुंतवणुकीच रक्कम वजा जाता, उर्वरित रक्कम उपसा जलसिंचन सहकारी संस्था, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, महाराष्ट्र राज्य सहकारी कृषि व ग्रामीण विकास बँक, तसेच व्यापारी बँकांकडून कर्जरुपाने उभारतील.

६) जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, महाराष्ट्र राज्य सहकारी कृषि व ग्रामीण विकास बँक, व्यापारी बँका तसेच राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँकेने मंजूर केलेल्या प्रकल्प खर्चाच्या २५ टक्के अथवा रु.१०० लाख यापैकी जी कमी असेल त्या रकमेइतके शासकीय अनुदान मंजूर करण्यात येईल.

७) ज्या योजनेत भूजलाचा वापर अभिप्रेत आहे त्या योजनेच्या सहकारी संस्थेची नोंदणी करण्यापूर्वी भूजल सर्वेक्षण यंत्रणेचे प्रमाणपत्र मिळविणे आवश्यक राहील.

८) उपसा जलसिंचन योजनेतील प्रत्यक्षात ७५ टक्के क्षेत्र सिंचनखाली आणल्यानंतर परभारे ज्या बँक/वित्तीय संस्थांकडून योजनेकरिता कर्जवाटप करण्यात आलेले आहे त्या बँकेत/वित्तीय संस्थेत शासनाकडून अनुदान जमा करण्यात येईल.

९) योजना हाती घेण्यापूर्वी तज्ज्ञांच्या मार्गदर्शनाखाली प्रत्यक्ष पाहणी करुन लाभार्थी शेतक-यांची संख्या निश्चित करणे आवश्यक राहील जेणेकरुन भविष्यात योजना राबवीत असताना काही शेतक-यांना पाणी मिळत नाही असा प्रश्न शक्यतोवर उद्भवू नये. तथापि, याही उपर योजना राबविताना काही शेतक-यांना पाणी मिळत नाही अशी अपवादात्मक परिस्थिती निर्माण झाल्यास, अनुदान देण्यापूर्वी ज्या शेतक-यांच्या जमिनीवर कर्जाचे बोजे चढविण्यात आले आहेत, परंतु ज्यांच्या जमिनी योजनेअंतर्गत भिजत नाहीत, अशांच्या जमिनीवरचे बोजे कमी करण्यात येऊन संबंधित कर्जाचे बोजे ज्यांना पाण्याचा प्रत्यक्ष लाभ मिळतो अशा लाभधारक शेतक-यांच्या जमिनीवर त्यांनी धारण केलेल्या जमिनीच्या क्षेत्राच्या प्रमाणात चढविण्यात येतील.

१०) नाबार्ड व्यतिरिक्त जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, महाराष्ट्र राज्य सहकारी कृषि व ग्रामीण विकास बँक तसेच व्यापारी बँकांच्या पातळीवर स्वनिधीतून मंजूर होणा-या सर्व योजनांना देखील वरील अनुदान देता येईल.

११) योजनेवर सहकार विभाग / सहकार आयुक्तांमार्फत नेहमीच्या पध्दतीप्रमाणे नियंत्रण ठेवले जाईल.

---